**श्री. सचिन सुदाम चौधरी यांना मानीव**
**दिनांक मंजूर होणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-०२२३/प्र.क्र.८०/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केटजवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१
तारीख: ०८ ऑगस्ट, २०२४

वाचा :-

१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२००२/प्र.क्र.२/१२, दि. ६/६/२००२
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२०१५/व्हीआयपी २१०/प्र.क्र.४१२/का-१२, दि. २१/८/२०१५
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/कार्या-१२, दि. १५/१२/२०१७
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन पत्र क्रमांक: बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२A/१६-ब दि.२९/१२/२०१७
५) संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे परिपत्रक क्र. प्रशासन/आस्था-२/प्र.क्र.२/व.लि /अंतिम जेष्ठता सुची/१५३२/२०१९, दि. ९/५/२०१९
६) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२, दि. ०१/०८/२०१९
७) संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे आदेश क्र. प्रशासन/आस्था-२/प्र.क्र.११/का.अ/पदोन्नती आदेश/२४४७/२०२०, दि. १६/१०/२०२०
८) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब दि.०७/०५/२०२१
९) संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे आदेश क्र. प्रशासन/आस्था-२/प्र.क्र.१५/का.अ/कार्यालय अधीक्षक/पदोन्नती/५४२/२०२२, दि. ४/२/२०२२
१०) प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे आदेश क्र. प्रशासन शाखा/आस्था-२/एस.एस. चौधरी/वरिष्ठ लिपीक/वि.चौकशी/प्र.क्र.८३/१८/२०२२, दि. १२/४/२०२२
११) संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे आदेश क्र. प्रशासन/आस्था-२/प्र.क्र.६/का.अ/कार्यालय अधीक्षक/पदोन्नती आदेश/२५१०/२०२२, दि. ९/६/२०२२
१२) श्री. सचिन सुदाम चौधरी, कार्यालय अधीक्षक यांचा दिनांक २९/९/२०२२ चा अर्ज.

१३) संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे शुध्दीपत्रक क्र.प्रशासन/आस्था-२/प्र.क्र.१५/कार्यालय अधीक्षक/पदोन्नती आदेश/३३३१/२०२३ दिनांक २८/०६/२०२३.
१४) आयुक्त,भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे पत्र क्र.प्रशासन/आस्था-२/कार्यालय अधिक्षक/ ३१४/२०२४ दि.२६/०६/२०२४
१५) संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचा आदेश जा.क्र./प्रशासन/आस्था-२/कार्यालय अधिक्षक/२१९०/२०२४ दि. १८.०७.२०२४

**प्रस्तावना :-**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील श्री. एन.आर.जगताप वरिष्ठ लिपीक (गट-क) यांना संदर्भाधीन क्र. ७ येथील दि.१६.१०.२०२० च्या कार्यालयीन आदेशानुसार कार्यालय अधिक्षक (गट-क) पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे. सदरील तदर्थ पदोन्नती दि.०७.०५.२०२१ पासुन पदोन्नती कोट्यात नियमित केली आहे. सदर पदोन्नतीच्या दिनांकास श्री. एन.आर.जगताप हे दि.०९.०५.२०१९ रोजीच्या वरिष्ठ लिपीक या संवर्गाच्या ज्येष्ठता सुचीनुसार श्री. सचिन सुदाम चौधरी यांच्यापेक्षा सेवाकनिष्ठ होते. सेवाज्येष्ठ श्री. सचिन सुदाम चौधरी यांचे विरुद्ध विभागीय चौकशी प्रलंबित असल्याने त्यांना पदोन्नती देण्यात आलेली नव्हती. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,पुणे यांच्या संदर्भाधीन क्र. १० येथील दि.१२.०४.२०२२ रोजीच्या आदेशान्वये श्री.सचिन सुदाम चौधरी यांना विभागीय चौकशीमधून निर्दोष मुक्त करण्यात आले आहे त्याअनुषंगाने भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडील संदर्भाधीन क्र. ११ येथील दि.०९.०६.२०२२ रोजीच्या आदेशान्वये श्री. चौधरी यांना वरिष्ठ लिपीक (गट-क) या पदावरुन कार्यालय अधिक्षक (गट-क), भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात आली.

तसेच श्री. सचिन सुदाम चौधरी यांना पदोन्नतीच्या पदावरील मानीव दिनांक देण्याची बाब विचाराधीन होती.

## आदेश:-

श्री. एन.आर.जगताप यांच्या वरिष्ठ लिपीक पदावरून कार्यालय अधिक्षक (गट-क) पदावरील तात्पुरती पदोन्नतीचा नियमित दिनांक ०७.०५.२०२१, श्री. सचिन सुदाम चौधरी यांना मानीव दिनांक म्हणुन अनुज्ञेय करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

०२. मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार व दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा.उच्च

न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून यासंदर्भात मा.न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून सदर मंजूरी देण्यात येत आहे.

०३. श्री. सचिन सुदाम चौधरी, कार्यालय अधिक्षक यांना कार्यालय अधिक्षक या पदावर दिलेला मानीव दिनांक हा सेवाज्येष्ठता व वेतननिश्चितीसाठी ग्राह्य धरण्यात यावा. श्री. सचिन सुदाम चौधरी यांची काल्पनिक वेतननिश्चिती कार्यालय अधिक्षक पदावर मंजुर केलेल्या दिनांक ०७.०५.२०२१ या मानीव दिनांकापासून करुन त्याचा प्रत्यक्ष लाभ त्यांना कार्यालय अधिक्षक पदावरील प्रत्यक्ष कार्यभार स्वीकारल्याच्या दिनांकापासून अनुज्ञेय राहील. तथापि, काल्पनिक वेतन निश्चिती केलेल्या कालावधीतील वेतन व भत्त्यांची थकबाकी श्री. चौधरी यांना अनुज्ञेय राहणार नाही.

सदरील आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील दि.२१.०८.२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०८११५०४२९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2024.08.08 15:58:43 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन ,शिवाजी नगर,पुणे
२. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग(कार्यासन१२/१६-ब),मंत्रालय,मुंबई.
३. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपुर (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता)
५. सहाय्यक संचालक (म.वि.व.ले.से) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी ,पुणे.

७. प्रादेशिक उपसंचालक , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,पुणे विभाग, सर्व.

८. निवडनस्ती (पापु-१५)